महाराष्ट्र दुय्यम सेवा निवडमंडळे आणि प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळे यांच्या कक्षेत येणा-या पदांबाबत कार्यवाही.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:प्रानिर्म-१२८८/प्रकरण-२६-८८/तेरा-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २ मे, १९८८.

वाचा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:प्रानिर्म-१२८६/प्र.८६[१]-तेरा-अ, दिनांक ९ फेब्रुवारी, १९८८.

शासन निर्णय :

राज्य शासनाच्या त्याचप्रमाणे काही निम-शासकीय संस्था/महामंडळे यांच्या दुय्यम सेवातील पदांवर उमेदवारांची निवड करण्यासाठी निवडमंडळे स्थापन करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:प्रानिर्म-१२८६-प्र.८६[१]/तेरा-अ, दिनांक ९ फेब्रुवारी, १९८८ अन्वये राज्य पातळीवर एक महाराष्ट्र दुय्यम सेवा निवडमंडळ आणि प्रादेशिक पातळीवर प्रत्येक महसूल विभागासाठी एक याप्रमाणे सहा प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळे, दिनांक १० फेब्रुवारी, १९८८ पासून स्थापन करण्यात आली आहेत. ह्या शासन निर्णयाच्या प्रती सर्व शासकीय कार्यालयांना स्वतंत्रपणे पाठविण्यात आल्या आहेत.

२. ह्या निवडमंडळांच्या कक्षेत मुंबई प्राथमिक शिक्षण कायदा, १९४७ च्या कलम २०८ अन्वये अस्तित्वात असलेली प्राथमिक शिक्षकांची पदे, तसेच जिल्हा परिषदा, पंचायत समित्या आणि नगरपरिषदा यांच्या दुय्यम सेवातील वर्ग-३ ची पदे आणण्याची तरतूद, मुंबई प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या आणि महाराष्ट्र नगरपरिषदा [सुधारणा] अधिनियम, १९८६ [१९८७ चा अधिनियम क्रमांक ४] मध्ये केली असून हा अधिनियम दिनांक १८ फेब्रुवारी, १९८८ पासून अंमलात आणण्यात आला आहे.

३. त्याचप्रमाणे महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ व महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ यांच्या सेवेतील जी पदे शासनाच्या सेवेतील वर्ग-३ च्या पदांच्या समकक्ष आहेत ती सर्व पदे [काही अपवाद वगळून] ह्या प्रादेशिक व राज्यस्तरीय निवडमंडळांच्या कक्षेत आणण्यात आली आहेत.

४. निवडमंडळांच्या कक्षेत आणण्यात आलेल्या पदांचा तपशील वर उल्लेखिलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:प्रानिर्म-१२८६/प्र.८६[१]/तेरा-अ, दिनांक ९ फेब्रुवारी, १९८८ च्या परिशिष्ट "ब" मध्ये दिला आहे. त्याचप्रमाणे ह्या निवडमंडळांच्या कक्षेतून वगळण्यात आलेल्या पदांचा तपशील त्याच शासन निर्णयाच्या परिच्छेद २[१] खालील अपवादात व परिशिष्ट "क" मध्ये दिला आहे.

५. उपरोक्त अधिनियम तसेच शासन निर्णय यांचा परिणाम असा आहे की, शासकीय कार्यालये तसेच जिल्हा परिषदा व पंचायत समित्या, नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य

मार्ग परिवहन महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ यांच्या दुय्यम सेवातील वर्ग-३ ची किंवा तत्सम पदे, ह्या एकूण पदांपैकी, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: प्रानिमं-१२८६-प्र. ८६[१]तेरा-अ, दिनांक ९ फेब्रुवारी, १९८८ मधील परिच्छेद २[३] च्या अपवादामधील व परिशिष्ट "क" मध्ये निर्दिष्ट केलेली पदे वगळून इतर सर्व पदे महाराष्ट्र दुय्यम सेवा निवडमंडळ तसेच प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळे यांच्या कक्षेत आली आहेत. त्यानुसार उपरोक्त शासन निर्णय आणि/किंवा अधिनियम अंमलात येण्याच्या दिवशी ह्या सर्व निवडमंडळांच्या कक्षेत आलेल्या पदांपैकी जी पदे रिक्त होती आणि जी त्या दिनांकानंतर रिक्त होतील अशा सर्व पदांपैकी सरळ सेवा प्रवेशाने भरावयाची पदे यापुढे फक्त उपरोल्लेखित निवड मंडळामार्फतच भरली पाहिजेत. त्यामुळे संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांना ह्या पदांवर थेट नियुक्त्या करता येणार नाहीत. तसेच अशा नियुक्त्या करण्यासाठी जर काही निवड समित्या/सल्लागार समित्या नियुक्त करण्यात आल्या असतील तर त्यांचे अस्तित्व दिनांक १० किंवा १८ फेब्रुवारी, १९८८ पासून आपोआप विसर्जन झाले आहे असे मानण्यात येईल.

६. अशा रीतीने निवडमंडळाच्या कक्षेत आलेल्या दुय्यम सेवांमधील वर्ग-३ च्या पदांवरील सरळ भरतीने करावयाच्या नेमणुका करण्यासाठी संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी त्यांच्या विभागातील संबंधित प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळाकडे विहित नमुन्यात मागणीपत्र पाठवावे. [ह्या मागणीपत्राचा नमुना वर उल्लेखिलेल्या शासननिर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: प्रानिमं-१२८६-प्र. ८६[१]-तेरा-अ, दिनांक ९ फेब्रुवारी, १९८८ सोबतच्या परिशिष्ट "ई" [जोडपत्र] मध्ये दिला आहे] आणि निवडमंडळाने शिफारस केलेल्या उमेदवारांच्याच नेमणुका कराव्यात. सदर नेमणुका निवडमंडळाने गुणवत्तेनुसार तयार केलेल्या यादीतील क्रमवारीनुसार करणे व तसे निवडमंडळास कळविणे हे संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यावर बंधनकारक राहील.

७. उपरोक्त दिनांक ९ फेब्रुवारी, १९८८ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "ब" मधील तरतुदीनुसार निवडमंडळाच्या कक्षेत असणाऱ्या पदांवर निवडमंडळाने शिफारस केलेले उमेदवार उपलब्ध होईपर्यंतच्या मधल्या काळात नियुक्ती प्राधिकारी पूर्णपणे तात्पुरत्या नेमणुका करू शकतील. परंतु ह्या नियुक्त्यांचा कालावधी कोणत्याही परिस्थितीत सहा महिन्यांपेक्षा जास्त असणार नाही. अशा तात्पुरत्या नेमणुका करतेवेळी संबंधित निवडमंडळाकडे मागणीपत्र पाठविणे नियुक्ती प्राधिकाऱ्यांवर बंधनकारक राहील. नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी अशा नेमणुका करताना त्या सेवायोजन कार्यालये, समाजकल्याण अधिकारी, सैन्यकालीन उमेदवारांच्या जिल्हाधिकाऱ्याकडील यादी, इत्यादी नेहमीच्या विहित मार्गानीच केल्या पाहिजेत.

८. त्याचप्रमाणे अशा नेमणुका करताना संबंधित पदांच्या सेवाप्रवेश नियमातील वय आणि अर्हता याबाबत विहित केलेल्या अटींची, तसेच मागासवर्गीय आणि इतर प्रवर्ग यांच्यासाठी पदे राखीव ठेवण्याबाबतच्या धोरणानुसार शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशांची काटेकोर पूर्तता होत आहे याची दक्षता नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी घेतली पाहिजे. प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळाकडे पाठविलेल्या मागणीपत्राच्या अनुषंगाने सहा महिन्यांच्या कालावधीत मंडळ पुरस्कृत उमेदवारांची यादी प्राप्त होण्याची शक्यता आहे किंवा नाही ह्याची मंडळाकडून माहिती मिळवावी आणि निवड मंडळाकडून लवकर यादी प्राप्त होण्याची शक्यता नसल्यास उपरोक्त

तरतुदीनुसार केलेल्या हंगामी निवडयुक्त प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळ पुरस्कृत उमेदवारांची निवड यादी प्राप्त होईपर्यन्त पुढे चालू ठेवण्यात याव्यात आणि तसे संबंधित प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळासही कळविण्यात यावे. हे उमेदवार निवड मंडळ अपुरस्कृत असल्याने अशा तात्पुरत्या नेमलेल्या कर्मचा-यांना सहा महिन्यांचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी तांत्रिक खंड देणे नियुक्ती प्राधिका-यांवर बंधनकारक राहील.

७. सरळ भरतीने हंगामी नेमणूका करताना संबंधित कर्मचा-यांना त्यांची नेमणूक केलेल्या पदासाठी प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळाकडून निवड न झाल्यास त्यांना कोणतीही पूर्वसूचना न देता नोकरीतून तात्काळ मुक्त करण्यात येईल अशा प्रकारची सूचना त्यांच्या नियुक्ती आदेशातच स्पष्टपणे समाविष्ट करण्यात यावी. प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळाकडून निवड यादी प्राप्त होताच सरळ भरतीने नेमलेल्या हंगामी कर्मचा-यांपैकी ज्यांची नावे निवड यादीत नसतील त्यांना नोकरीतून तात्काळ कमी करण्यात यावे. त्याचप्रमाणे निवडमंडळाकडे मागणीपत्र पाठविताना त्याबाबतची माहिती संबंधित कर्मचा-यांना त्यावेळी व्यक्तिशः देण्यात यावी व त्यांना निवड-मंडळाकडे अर्ज करण्यास सांगावे. अशा अर्जाची प्रत संबंधित कर्मचा-यांनी निवडमंडळाकडे थेट पाठविण्यास हरकत नाही.

८. नियुक्ती प्राधिका-यांनी तात्पुरत्या कालावधीसाठी नेमलेल्या कर्मचा-यांबाबत भविष्यकाळात कोणतीही समस्या उद्भवू नये म्हणून वरील सूचनांचे दक्षतापूर्वक व अत्यंत काटेकोरपणे पालन करणे नियुक्ती प्राधिका-यांवर बंधनकारक राहील. ह्यामध्ये हयगय झाल्यास त्याची गंभीर दखल घेण्यात येईल आणि त्याबद्दल संबंधित नियुक्ती प्राधिका-याला व्यक्तिशः जबाबदार धरण्यात येईल, ह्याची नोंद घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

कु. रा. कृष्णन्,
विशेष सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
राज्यमंत्री, सामान्य प्रशासन यांचे स्वीय सहायक,
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवडमंडळ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळे,
सर्व विभागीय आयुक्त [प्रत्येकी १० प्रती],
सर्व जिल्हाधिकारी [प्रत्येकी १० प्रती],
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी [प्रत्येकी १० प्रती],
संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय [३०० जादा प्रतींसही सर्व नगरपरिषदांना वाटण्यासाठी],

सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/
कार्यालय प्रमुख,
सचिव, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई [१०० जादा प्रतींसह],
उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,
मुंबई [१०० जादा प्रतींसह].

---

वि/६११९०